मुळें व त्याला त्या क्षेत्रांचें सिंहावलोकन जास्त चांगल्या रीतीनें करतां येत असल्यामुळें, इतरांना ज्या गोष्टी दिसत नाहींत त्या गोष्टी ह्या माणसाच्या ध्यानांत येतात. लोकांच्या ऐहिक गरजांकडे थिऑसफी बिलकुल दुर्लक्ष करीत नाहीं. थिऑसफी ही एकच अशी आध्यात्मिक चळवळ आहे कीं, जी राजकारण–अर्थकारणाला स्वतःच्या कार्यक्षेत्रांत महत्त्वाचें स्थान देऊन विधायक सूचना करूं शकते. थिऑसफीच्या वाङ्मयांत राजकारण, अर्थकारण, हे विषय आलेले आहेत आणि जगांतील जनतेचें दारिद्र्य कसें घालवितां येईल याबद्दल थिऑसफिस्टांच्या सूचनाही आहेत. या विषयासंबंधाचें थिऑसफीचें विधायक म्हणणें काय आहे तें ऐकण्याची तुमची इच्छा असली तर तें तुमच्यासमोर मी मोठ्या आनंदानें मांडण्यास तयार आहे.[1] पण प्रथम मला सांगा कीं तुम्हां तरुणांना लोकांचें दारिद्र्य घालविण्याची मनापासून खरोखरीच तीव्र इच्छा आहे का?

**प्रश्नकार**—अर्थात् तीव्र इच्छा आहे. कोणालाही दारिद्र्य नको असतें. आम्हांपैकीं अनेक दरिद्रि आहेत. कोणीही मनुष्य दरिद्रि नसावा असें आम्हांला वाटतें. सर्वांच्या दारिद्र्याची हकालपट्टी आम्हांला खरोखरीच करावयाला हवी आहे.

---

१ थिऑसफिकल सोसायटींत सर्वांना मतस्वातंत्र्य आहे. तेव्हां अमुक एक विचारसरणी सर्व थिऑसफिस्टांना मान्य आहे किंवा ती थिऑसफिकल सोसायटीची अधिकृत विचारसरणी आहे असें म्हणतां येणार नाहीं. ज्यांनीं थिऑसफीचा अभ्यास केला आहे अशा माणसांना "माझ्या मतें" अमुक एक विचारसरणी थिऑसफीला धरून आहे, इतकेंच म्हणतां येईल. पण ती विचारसरणी सर्व थिऑसफिस्टांना मान्य असलीच पाहिजे असा त्याचा अर्थ नाहीं. या पुस्तिकेंत जी विचारसरणी दिग्दर्शित केलेली आहे ती लेखकाच्या मतें थिऑसफीय आहे; पण ती थिऑसफिकल सोसायटीवर बंधनकारक नाहीं हें वाचकांनीं लक्षांत ठेवावें.

**थिऑसफिस्ट**—नीट विचार करून सांगा. मला अमुक गोष्ट हवी आहे असें जर मी म्हटलें तर ती गोष्ट मिळविण्याचीं जीं साधनें आहेत तीं मी उपयोगांत आणीन, असा त्याचा अर्थ होतो. एखाद्या विद्यार्थ्याला विचारलें, कीं तुला परीक्षेंत पास व्हायला हवें आहे का? आणि समजा त्यानें 'हवें आहे' असें उत्तर दिलें; पुढें त्याला विचारलें, अरे, तूं अभ्यास करशील का? आणि तो म्हणाला 'नाहीं.' तूं नाटकें, सिनेमा, खेळ, यांत अतिशय वेळ घालवितोस, तो वेळ वांचविशील का? आणि तो पुनः म्हणाला 'नाहीं.' तूं शाळेंत जाऊन तेथें लक्षपूर्वक अध्ययन करशील का? आणि तो पुनश्च म्हणाला 'नाहीं.' तर त्याचा अर्थ काय होतो? जो विद्यार्थी म्हणतो कीं, मी अभ्यास करणार नाहीं, खेळण्यांत सारा वेळ घालवीन, शाळेंत जाणार नाहीं आणि शिकणारही नाहीं, त्यानें जरी तोंडानें सांगितलें कीं मला पास व्हावयाला हवें आहे तरी खरोखरी त्याला पास व्हावयाला नको आहे असा त्याचा अर्थ होतो. एकादा माणूस म्हणाला कीं मला दिल्लीला जाण्याची इच्छा आहे, पण मी स्टेशनवर जाणार नाहीं; तिकिटाचे पैसे खर्च करणार नाहीं; आगगाडींत बसणार नाहीं; तर खरोखरी त्याच्या मनांत दिल्लीला जायचें नाहीं असा उघड अर्थ आहे. माणसाला अमुक अमक हवें आहे असें जर प्रामाणिकपणानें म्हणावयाचें असेल तर त्यानें त्या गोष्टीचीं साधनें हातीं धरलीं पाहिजेत. तीं साधनें हातीं घेण्याची जर त्याला इच्छा नसेल तर ती गोष्ट त्याला हवी आहे असें म्हणण्यांत अर्थ नाहीं. तुम्हांला जनतेचें दारिद्र्य नको आहे व दारिद्र्याची हकालपट्टी करावयाला हवी आहे. पण दारिद्र्याची हकालपट्टी ज्या गोष्टींनीं होईल त्या गोष्टी करण्यासारख्या असूनही जर तुम्हीं त्या केल्या नाहींत, तर 'आम्हांला दारिद्र्य नको आहे' या तुमच्या शब्दांवर कोण विश्वास ठेवील?

**प्रश्नकार**—दारिद्र्य घालविण्याला ज्या ज्या गोष्टी साधनीभूत असतील त्या सर्व आम्ही अवश्य अमलांत आणूं.

**थिऑसफिस्ट**—मला त्याचाच जबरदस्त संशय आहे. पण या मुद्याचा विचार आपण नंतर करूं.

**प्रश्न**—तुम्ही दारिद्र्य कसें घालविणार तें सांगा ?

**उत्तर**—प्रत्येक माणसाला दोन प्रकारच्या गोष्टी हव्या असतात, निरनिराळया वस्तु आणि निरनिराळया लोकांची मेहनत. आजारी माणसाला औषध ही वस्तु हवी असते; आणि डॉक्टरनें त्याला तपासावें, त्याचें रोगनिदान ठरवावें, आणि औषधयोजना करावी ही डॉक्टरची मेहनत (मदत) हवी असते. एकाद्याला घर बांधायचें असलें तर त्याला इमारती लांकूड, सीमेंट, विटा, चुना, दगड, खिळे वगैरे वस्तु लागतात आणि सुतार , गवंडी, इंजिनीयर वगैरे माणसांची मेहनत लागते. वस्तु व मदत-मेहनत यांखेरीज माणसाला आणखी कांहीं जरूर असत नाहीं. **वस्तु व लोकांच्या कामाची मदत या दोन गोष्टी प्रत्येक माणसाला जर भरपूर प्रमाणांत देतां आल्या तर जनतेचें दारिद्र्य जाईल.** या दोन प्रकारच्या गोष्टी आपणांला समाजाला भरपूर प्रमाणांत देतां येतील कीं नाहीं ? शिक्षणाची सोय करून आपणांला डॉक्टर, इंजिनीयर, सुतार, गवंडी, वकील, परिचारिका, मोटारड्रायव्हर, वगैरे माणसें तयार करतां येतील कीं नाहीं ? आणि समाजाला असल्या माणसांचा पुरवठा करतां येईल कीं नाहीं ? खरोखरी नाना प्रकारचीं कामें करणारीं असलीं माणसें तयार करण्यास कोणतीहि दुर्लंघ्य अडचण नाहीं. लोकांच्या मनांत असेल तर तें होऊं शकेल. तसेंच लोकांना लागणाऱ्या नाना वस्तु तयार करतां येतील कीं नाहीं ? तांदूळ, गहूं, चहा, फळफळावळ, कपडे, घरें, साबण, पुस्तकें, कागद, घड्याळ वगैरे वस्तु आपणांला तयार करतां येतील कीं नाहीं ? मोठे कारखाने काढले तर कापड, सिमेंट, साबण, घड्याळें वगैरे जिनसा मुबलक प्रमाणावर तयार होऊं शकतील. नवीन तऱ्हेनें शेती केली तर तांदूळ, गहूं, चहा, फळफळावळ वगैरे जिनसाहि मुबलक प्रमाणावर उत्पन्न करतां येतील. हिंदुस्थानांत गाय जेवढें दूध देते त्याच्या अनेकपट

दूध देणाऱ्या गाई इतर देशांत आहेत. हिंदुस्थानांत दर एकरीं जितका गहूं पिकतो त्याच्या अनेक पट गहूं इतर अनेक देशांत लोक पिकवूं शकतात. खरोखरी लोकांच्या मनांत असेल तर कारखाने, यंत्रें, वीज, वाफ, खतें यांच्या साह्यानें आपणांला मुबलक प्रमाणावर सर्व आवश्यक वस्तु तयार करतां येतील. **जरूरीच्या सर्व वस्तूंचें उत्पादन करण्यास कोणतीही दुर्लंघ्य अडचण माणसाच्या मार्गांत नाहीं.**

जुन्या काळीं हें शक्य नव्हतें. जुन्या काळीं माणसाला विज्ञानाचें साहाय्य नव्हतें. वाफ, वीज, यांची शक्ति त्याला उपलब्ध नव्हती. यंत्रें व कारखाने अस्तित्वांत नव्हते. तेव्हां प्रत्येक जिन्नस हातानें तयार करावी लागे. त्यामुळें थोड्याच जिनसांची निपज होई. आतां सर्व जिनसा यंत्रांनीं व मोठाल्या कारखान्यांत वाफ-वीज वगैरे शक्तीच्या साहाय्यानें हव्या तेवढ्या मोठ्या प्रमाणावर होऊं शकतात.

जिनसांचा मुबलक पुरवठा व नानातऱ्हेचीं कामें करणारीं पुष्कळ माणसें यांची सोय झाली तर प्रत्येक माणसाला जरूर त्या वस्तु व जरूर ती माणसाच्या मेहनतीची मदत मिळेशी करणें कठीण नाहीं. जर एका चाळींत पांचशे माणसें असलीं आणि प्रत्येकाला दोन दोन केळीं देणें अवश्य असलें तर हजार केळयांचा सांठा आपणांपाशीं असला पाहिजे. तितकीं केळीं असलीं तर प्रत्येकाला दोन दोन केळीं मिळतीलसें करणें फारसें कठीण नाहीं. पण पन्नासच केळीं असलीं तर सर्वांना तीं मिळणें अशक्य होईल. दोन केळीं मिळणें जरूर असलें तरी पुष्कळांच्या दृष्टीलाही केळें पडणार नाहीं, आणि कोणाच्या हातांत पाव केळें कोणाच्या हातांत अर्धें केळें असें होईल. जुन्या काळीं अशी स्थिति होती. त्या काळीं लोकांच्या दारिद्र्याची हकालपट्टी करतां आली नसती. आजच्या काळीं मुबलक पुरवठा करणें शक्य झालें आहे आणि म्हणूनच **दारिद्र्याची हकालपट्टी होण्यास खरोखरी कोणतीच अडचण नाहीं.**

**प्रश्न**—मग दारिद्र्याची हकालपट्टी आज कां होऊं शकत नाहीं ?

**उत्तर**—लोकांच्या मनांत ती गोष्ट करण्याची तीव्र इच्छा नाहीं म्हणून. तशी तीव्र इच्छा लोकांच्या मनांत असेल, दारिद्र्याची हकालपट्टी करण्याची योग्य योजना जर लोक आंखतील आणि त्या दिशेनें जर एकसारखें पुढें पुढें जातील, तर **शंभर दीडशे वर्षांत पृथ्वीवरील सर्व जनतेचें दारिद्र्य घालवून टाकतां येईल.** अशा रीतीनें मानवी इतिहासांत जी गोष्ट पूर्वी कधींहि झालेली नाहीं ती आपणांला साध्य करतां येईल.

**प्रश्न**—मग ही गोष्ट आजच कां होणार नाहीं? त्याला शंभर दीडशें वर्षें कशास हवींत?

**उत्तर**—जगांतील सर्व देशांत जिनसांचें उत्पादन आज पुरेसें वाढलेलें नाहीं म्हणून. जगांतील कांहीं देशांत औद्योगिक क्रान्ति मोठ्या प्रमाणावर झालेली आहे. उदाहरणार्थ इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें, या देशांत औद्योगिक क्रान्ति पुष्कळ प्रमाणांत झालेली आहे. मोठीं यंत्रें, व प्रचंड कारखाने त्या देशांत मुबलक आहेत व जिनसांचें उत्पादन फार मोठ्या प्रमाणावर तेथें होत आहे. पण युरोपमधील बाल्कन संस्थानांमध्यें ती क्रान्ति अल्प प्रमाणावरच झालेली आहे. अरबस्तान, इराण, हिंदुस्थान वगैरे देशांतहि ती क्रान्ति फारशी पुढें गेलेली नाहीं. ब्रह्मदेश, इंडोनेशिया यांची स्थिति हिंदुस्थानसारखीच आहे. चीन व आफ्रिका खंड यांची स्थिति हिंदुस्थानच्याहि मानानें मागासलेली आहे. जगांतील सगळया देशांत औद्योगिक क्रान्ति मोठ्या प्रमाणावर जेव्हां पसरेल, आणि त्या सगळया देशांत मोठमोठे यांत्रिक कारखाने निघतील तेव्हांच सर्वत्र सर्व जिनसांचें उत्पादन वाढेल व तेव्हांच सर्वांना सर्व सुखसोई देण्याची व्यवस्था होऊं शकेल. या सर्व मागासलेल्या देशांतही भांडवल आणून शक्य ते सारे कारखाने काढणें व ते यशस्वी करणें अवश्य आहे. तें होण्याला निदान शंभर दीडशें वर्षांचा कालावधि लागेल.

**प्रश्न**—पण इंग्लडांत औद्योगिक क्रान्ति मोठ्या प्रमाणावर झाली

आहे ना? यंत्रांच्या साहाय्यानें तेथें जिनसांची पैदास भरपूर प्रमाणांत होत आहे ना? मग इंग्लडांत तरी दारिद्र्याची हकालपट्टी कां झालेली नाहीं? अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांतहि कां झालेली नाहीं?

**उत्तर**—औद्योगिक क्रान्तीनें जिनसांची निपज फार मोठ्या प्रमाणावर करतां येते. पण एकाच देशांतील निपज वाढल्यानें कार्यभाग होत नाहीं. उलट तिसऱ्याच भानगडी निर्माण होतात. समजा एक देश आहे; त्यांत पुष्कळ कापडाच्या गिरण्या असून कापडाचें उत्पादन प्रचंड प्रमाणावर होत आहे, पण त्या देशाशेजारचे सर्व देश मागासलेले असून त्यांत जिनसांचें उत्पादन फारच कमी होत आहे. कापडाचें उत्पादन जास्त झाल्यामुळें ह्या एका देशांतील लोकांस कपडे मिळतील हे खरें आहे. पण त्या देशांतील कापडाची मागणी पुरविल्यावर त्या देशांतले कापडाचे कारखाने बंद ठेवावे लागतील. यंत्रानें कापड निर्माण होत असल्यामुळें एक माणूस हातानें जितकें कापड विणीत होता त्याच्या शंभर पट तो यंत्रानें विणूं शकेल. पण शेजारचे देश मागासलेले असल्यामुळें व तेथें यंत्रें व कारखाने नसल्यामुळें तेथील लोक आपल्या जिनसांचें उत्पादन हातानें करीत असणार. हातानें केलेलें उत्पादन इतकें कमी होत असतें कीं, उत्पादन करणाऱ्या माणसांचीच गरज भागण्याची मारामार पडते. समजा, शेजारच्या देशांत गव्हाची शेतें आहेत, पण तेथें यांत्रिक शेती नाहीं. तेथें एकेक शेतकरी हातानें काम करून जेमतेम स्वतःचें पोट भरण्याइतके गहूं पिकवीत आहे. त्याच्यापाशीं विकण्यासाठीं जास्त गहूं असणार नाहीं. अर्थात् शेजारच्या देशांत कितीहि कापड पैदा झालें तरी मोबदल्यांत गहूं देऊन कापड घेण्याची त्याला शक्ति नसणार, तेव्हां त्याला लंगोटी नेसून रहावें लागेल; आणि इकडे मुबलक कापड तयार करणाऱ्या देशाचें कापड तसेंच पडून राहील. त्या लोकांना कापडाचा मोबदला देऊन गहूं मिळविणें अशक्य होईल आणि गव्हाची पोळी त्यांच्या दृष्टीसही पडणार नाहीं. आपलें कापड खपत नाहीं म्हणून त्या देशाला आपले कापडाचे कारखाने बंद ठेवावे लागतील व कामगार

बेकार होतील. याचा अर्थ असा कीं, एका देशानें आपलें उत्पादन वाढविलें व दुसऱ्याचें उत्पादन वाढलें नाहीं तर दोन्हीं देशांचें नुकसान होतें. पूर्वी राजकारणी पुरुषांना वाटे कीं शेजारच्या देशाचा व्यापार आपण बुडविला तर त्यांत आपला फायदा आहे. आतां त्यांना उलट अनुभव येत आहे कीं, शेजारचा देश कंगाल असला, तेथें उत्पादन कमी असलें, तर आपला माल घेण्याची शक्ति तेथल्या लोकांना नसल्यामुळें आपले कारखाने बुडतात व आपलें नुकसान होतें. शेजारचा देश जर श्रीमंत असेल, तेथें औद्योगिक क्रान्ति पुष्कळ प्रमाणावर होऊन दर माणशीं जिनसांचें उत्पादन वाढलें असेल, तरच ते आपला माल घेऊं शकतील आणि आपणांला श्रीमंत करतील. **श्रीमंत शेजारी आपणांला श्रीमंत करतो व भुकेकंगाल शेजारी आपणांला भुके-कंगाल करतो हा धडा आजचें अर्थकारण जगांतील पुढाऱ्यांना शिकवीत आहे. आणखीही एक धडा आजचें अर्थकारण घालून देत आहे. तो असा कीं, अनेक देशांनीं त्याच त्याच जिनसांची पैदास केली तर त्यांत सर्वांचें नुकसान असतें.** सर्व देशांनीं साखरेचे कारखाने काढले तर सर्व देश साखर विकूं पाहातील व कोणीही दुसऱ्याची साखर विकत घेणार नाहीं. साखर विकली न जातां पडून राहील व साखरेचा धंदा बसेल. तसेंच निरनिराळया साखरेच्या कारखान्यांत अयोग्य चढाओढ होऊन पुष्कळ कारखाने रसातळास जातील. याचा अर्थ असा कीं, पाऊस, जमीन, उसाचें पीक वगैरे बाबतींत ज्या देशांना विशेष अनुकूलता असेल त्यांनींच साखर तयार करावी. कारण त्यांनाच साखर स्वस्त विकतां येईल; त्यांची साखर इतर देशांनी विकत घ्यावी; व त्याइतर देशांना ज्या इतर वस्तु उत्पादन करण्याची जास्त सोय असेल त्याच त्यांनीं तयार कराव्या व त्या जिनसांच्या मोबदल्यांत त्यांनीं साखर विकत घ्यावी. अन्य शब्दांनीं हें सांगावयाचें झाल्यास असें म्हणावें लागेल कीं **सर्व देशांनीं सर्व जिनसांची पैदास करतां कामा नये. ज्या देशांत**

जो माल उत्तम आणि स्वस्त होईल तेवढाच प्रत्येक देशानें करावा, आणि प्रत्येकानें आपापला माल मोबदल्यांत देऊन इतर सर्व देशांचा विविध माल घ्यावा. असें केल्यानें प्रत्येकाला बाजारपेठ मिळेल, प्रत्येक जातीच्या मालाचा उठाव होऊन व त्याचा व्यय होऊन तो संपेल. त्यानें सारखी नवीन मागणी येत राहील आणि नवी पैदास होत जाऊन व्यापाराचा ओघ अखंड चालू राहील.

सारांश सांगावयाचा झाल्यास, जगांतील सर्व देशांत नाना प्रकारचे पुष्कळ कारखाने काढले पाहिजेत, ते त्याच त्याच जिनसांचे असतां कामा नयेत, प्रत्येक देशानें स्वतःची गरज भागविल्यावर आपला माल इतर देशांना योग्य भावानें मोबदल्यांत दिला पाहिजे, त्यांनीं तो घेतला पाहिजे, आणि अशा रीतीनें सर्व देशांना सर्व प्रकारचा माल मिळेल अशी व्यवस्था झाली पाहिजे. जगभर नवीन कारखाने काढणें, वरील आंतरराष्ट्रीय धोरणाची योजना आंखणें, ती अंमलांत आणण्यासाठीं निरनिराळ्या आंतरराष्ट्रीय संस्था स्थापणें, त्या संस्थांत सर्व देशांचा प्रवेश होऊन सर्व देशांनीं या धोरणानें चालणें या गोष्टी व्यवहारांत येण्यास शंभर दीडशें वर्षें लागतील; व मग सर्व जिनसा मुबलक प्रमाणांत सर्व देशांना मिळून त्या प्रत्येक माणसाला देतां येणें शक्य होईल.

**प्रश्न**—सर्व जगाला गवसणी घालण्याऐवजीं आम्ही फक्त हिंदुस्थानचा विचार केला तर नाहीं का चालणार? फक्त हिंदुस्थानचेंच दारिद्र्य आपणांला नाहींसें करतां नाहीं का येणार?

**उत्तर**—बहुतांशीं तसें करतां येणार नाहीं. जगांत कोणताहि देश स्वयंपूर्ण नाहीं. हिंदुस्थानांत दगडी कोळसा, रॉकेल वगैरे अनेक पदार्थ होणार नाहींत. त्यांचे कारखाने येथें हट्टानें काढले तर त्या जिनसा महाग पडतील. दुसऱ्या देशांत त्या जिनसा स्वस्त होऊं शकतील. आपण त्या, त्या देशांतून घेण्यांत आपला फायदा आहे व त्या देशांचाहि फायदा आहे. हिंदुस्थानांत कोणत्या जिनसांचे कारखाने काढल्यास त्या जिनसा उत्तम

व स्वस्त देतां येतील ही गोष्ट तज्ज्ञांनीं माहिती मिळवून ठरवावयाची आहे. पण आपण क्षणभर असें धरून चालूं कीं हिंदुस्थानांत साखरेचे कारखाने काढणें योग्य आहे. तुम्ही म्हणतां, आपण सगळया जगाचा विचार न करतां फक्त हिंदुस्थानपुरता विचार करूं. तुम्ही हिंदुस्थानला लागेल इतकीच साखर तयार केलीत तर तुम्हांला रॉकेल, दगडी कोळसा वगैरे जिनसा मिळणार नाहींत. रॉकेल ही आवश्यक वस्तु आहे. प्रत्येक खेडेगांवांत ती लागते. रॉकेल खेडेगांवांत स्वस्त दरानें मिळालें नाहीं तर त्या ऐवजी दुसरी महाग जिन्नस खेडूतांना विकत घ्यावी लागेल आणि खेडेगांवांतील दारिद्र्य वाढेल. तेव्हां आपणांस लागते त्यापेक्षां पुष्कळ अधिक साखर हिंदुस्थाननें तयार केली पाहिजे. ती इतर देशांना विकली पाहिजे व मोबदल्यांत त्यांच्याकडून स्वस्त दरानें रॉकेल मिळविलें पाहिजे. त्यांत हिंदुस्थानचा व रॉकेल काढणाऱ्या देशांचा असा दोघांचा फायदा आहे. पण तुम्ही हिंदुस्थानपुरता विचार केलात व तुमच्या स्वस्त साखरेचा रॉकेलवाल्या देशांना फायदा न दिलात तर ते देशहि आपल्यापुरताच विचार करतील. म्हणजे तुम्ही त्यांस साखर देणार नाहीं अथवा महाग भावानें द्याल; व ते तुम्हांस रॉकेल देणार नाहींत अथवा महाग भावानें देतील. त्यानें आपल्या देशांत रॉकेलची टंचाई व महागाई होईल. त्यांच्या देशांत साखरेची टंचाई व महागाई होईल. दारिद्र्य म्हणजे ‘ माणसाला जरूर त्या जिनसा न मिळणें ’ असा अर्थ असल्यामुळें दोन्ही देशांत दारिद्र्य वाढेल. अर्थात् दारिद्र्याची हकालपट्टी करूं पहाणाऱ्यांनीं हें धोरण स्वीकारणें म्हणजे कार्यनाश होय.

जी गोष्ट निरनिराळया देशांना लागू आहे तीच गोष्ट एकाच देशांतील प्रांतांना, जिल्ह्यांना, तालुक्यांना व गांवांनाहीं लागू आहे. मुंबई इलाख्यांत पुष्कळ कारखाने काढले आणि मद्रास इलाख्यांत काढले नाहींत तर मुंबईत दर माणशीं उत्पादन वाढेल. पण मद्रासेंत वाढणार नाहीं. मद्रासचे लोक मुंबईच्या जिनसा विकत घेऊं शकणार नाहींत, आणि ते दरिद्री रहातील. मुंबईला मद्रासची बाजारपेठ न मिळाल्यामुळें

मुंबईचे कारखानेही तितके चांगलें चालणार नाहींत. **जर आपणांला दारिद्र्याची हकालपट्टी करावयाची असेल तर सर्व देशांत व प्रत्येक देशांतल्या सर्व विभागांत कारखाने काढले पाहिजेत, व स्थूलमानानें सर्व देशांत व प्रत्येक देशांतील सर्व विभागांत योग्य असे कारखाने निघून सर्वत्र उत्पादनाची वाढ झाली पाहिजे.**

**प्रश्न**—अहो, यंत्रांनीं बेकारी निर्माण होते. एक यंत्र अनेक माणसांचें काम करतें आणि लोक बेकार होतात. तुम्ही सर्व जगभर कारखाने काढलेत तर दारिद्र्याची हकालपट्टी होण्याऐवजीं जगभर बेकारी मात्र माजेल!!

**उत्तर**—यंत्रें नव्हतीं त्या जुन्या काळीं माणसें हातानें काम करीत, अष्टौप्रहर काम करीत व अगदीं थोड्या जिनसांचें उत्पादन होई. या थोड्या जिनसा सर्वांच्या वांट्यास येणें अशक्य असल्यामुळें लोक दरिद्रि रहात. आतां यंत्रें आलीं आहेत. तीं जिनसांचें उत्पादन वाढवितात. म्हणूनच सर्वांना त्या जिनसा मिळण्याची शक्यता सध्यां निर्माण झाली आहे. कल्पना करा, कीं पूर्वीं शंभर माणसें सारा दिवस शेतीचे काबाडकष्ट करून जेमतेम आपलें पोट भरीत व कसेंबसें आपलें अंग झांकीत. यांत्रिक कारखाने, यांत्रिक व सुधारलेली शेती, खतें, यांचा उपयोग आपण केला तर त्यांतलीं पन्नास माणसें पूर्वींपेक्षां अधिक अन्न व वस्त्र यांची पैदास करतील; व समजा, पन्नास बेकार राहतील. या पन्नासांना फुकट अन्नवस्त्र दिलें तरी पूर्वींपेक्षां वाईट स्थिति येणार नाहीं. तेव्हां यंत्रांनीं दुःस्थिति येते असें मानणें मूर्खपणाचें आहे. जर दुसरें तिसरें कांहीं करतां येत नसेल तर कामाचे तास निम्मे करून त्याच पगारावर या शंभरांनाही कामावर घेतां येईल व पूर्वींइतकीच चांगली स्थिति राहील. पण एक नवा सीमेंटचा कारखाना काढला, दुसरा विटांचा काढला आणि वरील पन्नास बेकारांपैकीं पंचवीस प्रत्येक कार-खान्यांत काम करूं लागले तर सीमेंट व विटा या नवीन जिनसांचें उत्पा-

दन होईल व लोकांना घरें मिळूं शकतील. यंत्राच्या साहाय्यानें कमी माणसांना अधिक उत्पादन करतां येतें. त्यानें कांहीं माणसें बेकार होतात. त्यांस नव्या कारखान्यांत गुंतविलीं पाहिजेत. नव्या कारखान्यांत गुंतण्याच्या अगोदर त्यांची दुसरी कांहीं सोय थोडे दिवस लाविली पाहिजे. कांहींच सोय निघत नसेल तर त्यांस फुकट खाऊं घातलें तरी नुकसान नाहीं. पण बेकारीचें निमित्त सांगून **यंत्रांना विरोध करणें म्हणजे आगगाडीमधील गर्दीचें निमित्त सांगून प्रवासच रहित करण्यासारखें वेडेपणाचें होईल. यंत्रांना विरोध केला तर माणसाचे काबाडकष्ट वाढतील व ते काबाडकष्ट करूनही माणसाला आवश्यक वस्तु मिळणार नाहींत. दारिद्र्य नको असेल तर यंत्रें घेतलीं पाहिजेत. तीं घेतल्यामुळें कांहीं अडचणी निर्माण होत असतील तर त्यांचा बंदोबस्त इतर मार्गांनीं केला पाहिजे.**

**प्रश्न**—समाजसत्तावादी पक्ष व कम्युनिस्टपक्ष हे असें म्हणतात, कीं सर्व उद्योगधंदे व कारखाने—उत्पादनाचीं सर्व साधनें—सरकारच्या मालकीचीं करावीं म्हणजे जनतेचें दारिद्र्य जाईल. जो फायदा आज भांडवलदारांना मिळतो तो सरकारला मिळेल आणि सरकारला त्या पैशानें जनतेचें दारिद्र्य दूर करतां येईल, हें खरें का ?

**उत्तर**—या म्हणण्यांत थोडासा सत्यांश आहे, पण फार नाहीं. जगांत दरिद्रीपणा इतक्या मोठ्या प्रमाणावर पसरलेला आहे व भांडवलदार लोक त्यामानानें इतके थोडे आहेत, कीं त्यांचा सगळा फायदा एकत्र केला तरी त्यानें सर्वसामान्य जनतेचा कातही होणार नाहीं. पूर्वींच्या शालेय पुस्तकांत एक गोष्ट होती; ती अशी. एकदां एक कंगाल माणूस एका कोट्याधीशाकडे गेला आणि म्हणाला ‘ तूं व मी हीं एका ईश्वराचीं लेकरें असल्यामुळें मी तुझा सख्खा भाऊ लागतों. तेव्हां तूं मला तुझ्या इस्टेटींतला माझा वांटा देऊन टाक ! ’ हें ऐकून त्या कोट्याधीशानें त्याच्या हातावर एक दिडकी ठेविली. तेव्हां त्या कंगाल माणसानें

विचारलें " एवढाच का माझा वांटा ? " त्यावर तो कोट्याधीश उद्गारला " तुझ्यासारखे माझे सख्खे भाऊ जगांत इतके आहेत कीं त्या सर्वांना मी त्यांचा वांटा दिला तर प्रत्येकाला एकेक दिडकीही देतां येणार नाहीं. तुझ्या न्याय्य वांट्यापेक्षां मी तुला जास्तच संपत्ति दिली आहे." या गोष्टीवरून पुष्कळच शिकण्यासारखें आहे. जगांत दारिद्र्य इतकें आहे कीं, आजच्या संपत्तीची कशीही वांटणी केली तरी तें जाणार नाहीं. दारिद्र्य घालवावयाचें असेल तर जगांतील संपत्ति ( वस्तु ) अनेक पटींनीं वाढविली पाहिजे एका चाळींतील शंभर लोकांना जर केळीं द्यावयाचीं असलीं व प्रत्येकाला दोन दोन केळीं देणें रास्त असलें तर पन्नास केळ्यांच्या एका लोंगरानें कधींही भागावयाचें नाहीं. मग वांटणी कशीही करा व वांटणी करण्याचें काम भांडवलदाराच्या हातीं द्या अथवा कम्युनिस्टाच्या हातीं द्या. एक अ ला केळीं देईल व ब ला देणार नाहीं. दुसरा ब ला देईल आणि अ ला देणार नाहीं. पण सर्वांना दोन दोन केळीं केव्हांही मिळणार नाहींत. केळ्यांची संख्या चौपट वाढेल तेव्हांच प्रत्येकाला दोन दोन केळीं देतां येणें शक्य आहे. तोच न्याय आजच्या अर्थकारणाला लागू आहे. भांडवलदारांचा फायदा सरकारनें घेऊन मजुरांना वांटला तरी फार मोठा फरक होणार नाहीं. जेव्हां जगांतील संपत्ति अनेक पटींनीं वाढेल, वस्तूंचें उत्पादन वाढेल आणि माणसें जी कामाची मदत समाजाला देतात ती वाढेल, तेव्हांच दारिद्र्याच्या हकालपट्टीचा प्रश्न माणसाच्या आटोक्यांत येईल. थोडे अपवाद वगळल्यास भांडवलदार आणि मजूर दोघेही सारखेच स्वार्थी असतात. पुष्कळ भांडवलदार लबाडीनें नफेबाजी करतात. अशा उदाहरणांत भांडवलदारांची मालकी काढून सरकारला कारखान्याची मालकी देणें कधीं कधीं योग्य ठरेल. जेव्हां तशी जरुरी उत्पन्न होईल तेव्हां तसें करण्यास प्रत्यवाय नाहीं. पण दारिद्र्याची हकालपट्टी करावयाची असली तर त्या कामांत कारखान्यांची मालकी कोणाकडे ठेवावी हा मुद्दा अगदीं गौण आहे. योग्य फायदा घेऊन जर भांडवलदार आपले कारखाने उपरिनिर्दिष्ट धोरणानुसार चालविण्यास तयार असतील

तर त्यांवर त्यांची मालकी ठेवण्यास हरकत नाहीं. मुख्य मुद्दा असा कीं **उत्पादन अनेक पटींनीं वाढलें पाहिजे, व मघाशीं सांगितलेल्या धोरणानुसार त्या उत्पादनाचा विनिमय झाला पाहिजे. हें जोंवर नीट होत राहील तोंवर उत्पादनाचीं साधनें भांडवलदारांच्या मालकीचीं असलीं अथवा सरकारच्या मालकीचीं तरी जवळ जवळ एकच. या धोरणाची योजना केली नाहीं तर दारिद्र्य जाणार नाहीं, मग उत्पादनाचीं साधनें कोणाच्याही हातांत असोत.**

**प्रश्न**—जगभर सर्वत्र सर्व जिनसांचें उत्पादन वाढलें तरी प्रत्येक माणसाला त्या जिनसा कशा मिळणार ? पुण्याच्या प्रत्येक नागरिकाला भरपूर पाणी हवें असलें तर नुसतें कात्रजच्या तलावांतील पाणी वाढवून भागत नाहीं. तें प्रत्येक माणसाच्या घरीं नळानें आणावें लागतें. जगभर निर्माण झालेल्या या वस्तु तुम्ही प्रत्येकाला कशा देणार ?

**उत्तर**—पुरेशा वस्तु उपलब्ध असल्या तर त्या सर्वांना नीटपणें वांटण्याचें काम तितकेंसें कठीण जाणार नाहीं. हल्लीं आगगाड्या, आगबोटी, विमानें, मोटारी वगैरे मुबलक वहातुकीचीं साधनें माणसाला उपलब्ध आहेत. कांहीं दिवसांपूर्वीं ब्रेझिलमधला तांदूळ मुंबईकर खात होते. हल्लीं लंडनमधला इंग्रज सकाळच्या न्याहारीच्या वेळीं अमेरिकन गव्हांचा पाव ऑस्ट्रेलियांतल्या मांसाच्या तुकड्याबरोबर आणि रत्नागिरीच्या हापूसच्या आंब्याच्या फोडीसह खात असतो असें ऐकतों. वहातुकीच्या साधनांनीं ही सोय झालेली आहे. हल्लीं एका देशाचें चलन दुसऱ्या देशांत चालत नाहीं. तेव्हां एका देशचे लोक दुसऱ्या देशांत पैसे पाठवून तेथील माल विकत घेऊं शकत नाहींत. एक देश आपला माल दुसऱ्या देशांत पाठवितो आणि तो दुसरा देश त्याच किंमतीचा आपल्या देशांत झालेला वेगळा माल पहिल्या देशास

देतो. अशा मालाच्या मोबदल्यानें दोघांच्या मालाची विक्री होते आणि आजच्या वहातुकीच्या साधनांनीं तो देशोदेशीं रवाना होतो.

इतर देशांतून आलेला माल व स्वतःच्या देशांत तयार होणारा माल न्याय्य प्रमाणांत सर्वांना मिळाला पाहिजे. माल मुबलक असला कीं तो न्याय्य प्रमाणांत सर्वांना मिळेसा करणें सोपें होतें. प्रत्येक माणूस पैसा देऊन जिन्नस विकत घेतो. यंत्राच्या साहाय्यानें काम करणारा माणूस जास्त जिनसा तयार करतो. त्याबद्दल त्याला अधिक मोबदला ( वेतन ) मिळतो. त्याच्यापाशीं अधिक मोबदला असल्यामुळें त्याला बाजारांत जास्त व नानाविध जिनसा घेतां येतात; व इतरांच्या कामाची मदतहि अधिक विकत घेतां येते. त्याची जिनसा विकत घेण्याची शक्ति वाढलेली असते. जो यंत्राशिवाय जिनसा तयार करतो त्याचें उत्पादन कमी असतें. कमी उत्पादनामुळें त्याला कमी मोबदला ( वेतन ) मिळतो आणि बाजारांत जिनसा किंवा काम विकत घेण्याची त्यांची शक्ति अल्प असते. यावरून दिसून येईल कीं जो यंत्राच्या साहाय्यानें जास्त उत्पादन करील त्याची जिनसा विकत घेण्याची शक्ति वाढते. उत्पादनशक्ति ( Productive power ) व क्रयशक्ति ( Purchasing power ) हीं समप्रमाणांत असतात. यंत्रानें उत्पादनशक्ति वाढते, म्हणजेच क्रयशक्ति वाढते आणि त्या वाढलेल्या क्रयशक्तीमुळें माणूस नाना वस्तु व अनेकांची मेहनत विकत घेऊं शकतो.

मात्र लबाड माणसांना या गोष्टींत ढवळाढवळ करतां येणें शक्य असतें. पुष्कळ उत्पादनशक्ति असणाऱ्या माणसाला कमी पगार देणें, त्या उत्पादनांतला सर्व फायदा आपण स्वतः घेऊं पहाणें, नफेबाजी करण या गोष्टी लबाड भांडवलदार करूं शकतो. तसेंच लबाड मजूरहि भरपूर पगार घेऊन आळशीपणानें उत्पादन घटवून कारखानदाराचें नुकसान करतो. असल्या कारवायामुळें समाजांत अन्याय होतो, आणि

प्रामाणिक मजुराला न्याय्य पगार मिळत नाहीं आणि प्रामाणिक भांडवलदाराचा धंदा नुकसानींत जातो. या गोष्टींचा बंदोबस्त अंशतः लोकमतानें व अंशतः कायद्यानें करावा लागेल. भांडवलदारानें वाजवीपेक्षां जास्त नफा घेतां कामा नये, मजुराला योग्य वेतन मिळालें पाहिजे, मजुरानें झटून काम केलें पाहिजे, याचें आपणांला लोकमत बनवावें लागेल व कायदेही करावे लागतील, आणि मग लबाड लोकांच्या कारवाया कमी होऊन सर्व माणसांना या वाढलेल्या संपत्तीचा भरपूर वांटा देतां येईल व त्यांचें दारिद्र्य घालवितां येईल. कोणते कायदे करावे लागतील हा भाग तपशीलाचा आहे. पुण्याच्या लोकांना जास्ती पाणी–पुरवठा करावयाचा असला तर कात्रज तलावाचें पाणी वाढविलें पाहिजे आणि जास्ती पाण्याचा प्रवाह शहरांत आणला पाहिजे असें सामान्यतः सांगतां येईल. पण जास्त पाणी शहरांत आल्यावर कोणत्या पेठेंत किती मोठ्या नळानें पाणी न्यावें लागेल, कोणत्या रस्त्यावरचे नळ लहान असले तरी चालतील, पाणी सोडण्याच्या चाव्या कोठें असाव्या, किती तास पाणी सोडावें, घरोघर पाणी देणारी पाईप किती व्यासाची असावी, उगीच नळ सोडून जें पाणी फुकट घालवितात त्यांचा बंदोबस्त कसा करावा या गोष्टी तपशिलाच्या आहेत. निरनिराळया गोष्टींचा विचार करून त्या अडचणी तज्ज्ञांच्या साहाय्यानें दूर कराव्या लागतील, व त्या दूर करण्यांत चूक झाल्याचें दिसून आल्यास उपाययोजना बदलाव्याहि लागतील. हाच न्याय अर्थकारणाच्या महत्त्वाच्या प्रश्नांस लागू आहे. त्यांतील मूलभूत गोष्टी आज सांगतां येतील. पण तपशिलाचा भाग सध्यांच सांगतां येणार नाहीं. लबाड माणसें कोणत्या अडचणी करतील तें अगोदर समजणार नाहीं. जसजशा अडचणी निर्माण होतील तसतसे कायद्याचे उपाय तज्ज्ञांच्या साहाय्यानें योजून त्या अडचणीस पायबंद घालतां येईल; आणि त्याबाबत एक उपाय यशस्वी झाला नाहीं तर तो टाकून दुसऱ्याची योजना करावी लागेल. तपशीलाचा बारीकसारिक भाग आज जरी नीट सांगतां न आला

तरी दारिद्र्याची हकालपट्टी करण्याची सर्व-सामान्य योजना काय आहे, त्याचा खुलासा मी केला आहे व तो कोणालाही समजण्यासारखा आहे.

**प्रश्न**—जगभर सर्वत्र कारखाने काढावयाचे असले तर पुष्कळ भांडवल लागेल. हिंदुस्थानांत तें नाहीं.

**उत्तर**—भांडवल अर्थात्च पाहिजे. त्याची हळू हळू पण एकसारखी तरतूज केल्याशिवाय चालणार नाहीं. स्वतःची बचत करून अथवा परकीय लोकांसमोर नाक घांसून तरतूज केली पाहिजे. ती न झाल्यास आम्ही जनतेचें दारिद्र्य घालवूं असें म्हणणें म्हणजे जनतेला फसविणें होय.

**प्रश्न**—लोकांचें दारिद्र्य घालविण्याकरितां सध्यां संप व टाळेबंदी हे उपाय कोणी योजतात. नुकसानभरपाई न करतां जमीनदारांच्या जमिनी काढून घ्या, जमीनमालकांच्या जमिनी हिसकावून घेऊन त्या सर्व शेतकऱ्यांना द्या, श्रीमंतांवर जास्त प्राप्तीकर ठेवा, वारसा हक्कानें इस्टेटी मिळवणाऱ्यांपासून जबर कर घ्या, वगैरे अनेक सूचना हल्लीं केल्या जात आहेत. त्या अमलांत आणल्यास जनतेचें दारिद्र्य कितपत फिटेल ?

**उत्तर**—फारसें फिटणार नाहीं. समजा एका चाळींत पांचशें माणसें आहेत आणि प्रत्येकाला दोन केळीं मिळण्याची व्यवस्था करणें न्याय्य आहे. त्यासाठीं शंभर केळयांचीं दहा लोंगरें लागतील. पण जर तितकीं लोंगरें मिळणें शक्य नसल्यामुळें दोनच लोंगरांचीं केळीं आपण वांटलीं तर तीं न्याय्य रीतीनें वाटतां येणार नाहींत. वांटणारे दोन असले तर ते प्रत्येकीं दहा केळीं स्वतःकरतां ठेवतील. पुष्कळांना केळीं मिळणारच नाहींत. वशिलेबाज लोकांपैकीं कांहींकांना दोन, तीन, चार इतकीं केळीं मिळतील. कोणाच्या वांट्यास अर्धें केळें, कोणाच्या वांट्यास पाव केळें कोणाच्या वांट्यास नुसत्या साली, अशी विभागणी होईल. या वेळीं एकाच्या हातांत दहा व कांहींच्या हातांत प्रत्येकीं दोन-तीन चार केळीं पाहून जर एखादा माणूस म्हणाला 'यांच्या हातातलीं केळीं

हिसकून घेऊन व तीं सर्वांना वाटून आपण सर्वांचें दारिद्र्य घालवूं या तर तें जमेल का ? असल्या उपायांनीं विशिष्ट माणसांची लबाडी उघडकीस आणतां येईल, कांहींच न मिळालेल्या आठदहा माणसांना एकेक केळें देतां येईल. पण केळ्याविषयींच्या दारिद्र्याच्या हकालपट्टीबाबत हे उपाय म्हणजे दर्यामें खसखस असे होतील. हिसकावलेलीं केळीं इतकीं थोडीं असतील कीं त्या माणसांचा त्या केळ्यांनीं कातही होणार नाहीं. कर देणारे श्रीमंत लोक इतके थोडे आहेत कीं फार करवसुली होणार नाहीं. उद्योगी लोकांवर जबर कर बसवून त्यांचें बरेचसे पैसे सरकारनें घेतले तर उद्योगी लोकांसमोरचें पैशाचें आमिष नष्ट होऊन ते उद्योग करीनासे होतील. जमीनदारांच्या जमिनी काढून घेतल्यानें जमिनीचें उत्पन्न वाढणार नाहीं. मुख्य प्रश्न तें वाढविण्याचा आहे. जगांत सर्वत्र योग्य वस्तूंचें उत्पादन वाढविणें, व योग्य फायद्यान त्या उत्पादनाची अदलाबदल करणें ही सर्वांत महत्त्वाची गोष्ट आहे. तें धोरण स्वीकारलें तर दारिद्र्य हटवितां येईल; मग जमिनदारी असो वा नसो, वारसा हक्काचा कर असो वा नसो. त्या गोष्टीं गौण आहेत. तें धोरण न स्वीकारलें तर दारिद्र्य जाणार नाहीं. मग कायदे कोणतेही असोत अथवा संप, टाळेबंदी, जाळपोळ, मारामाऱ्या कितीही होवोत.

**प्रश्न**—या योजनेखेरीज जनतेचें दारिद्र्य घालविण्याची दुसरी एकादी योजना शक्य आहे का ?

**उत्तर**—माझ्या मतें नाहीं. पण तुम्हांला दुसरी योजना कशासाठीं हवी आहे ? या योजनेंत कोणतें वैगुण्य तुम्हांला दिसतें ? ही योजना चुकीची आहे, ती यशस्वी होणार नाहीं असें का तुम्हांला वाटतें ?

**प्रश्न**—मला तुमची ही योजना चुकीची दिसत नाहीं. ती अंमलांत आणली तर यशस्वी होऊन जगांतून दारिद्र्याचा नायनाट होईल असेंच मला वाटतें. पण ती अंमलांत येईल कीं नाहीं याचा संशय वाटतो. ती अंमलांत आणावयाची असली तर राष्ट्रीयवृत्ति गौण मानून आंतरराष्ट्रीय

भावनेला अग्रपूजेचा मान दिला पाहिजे. तरुण पिढीला आणि जगांतील राजकारणी देशभक्तांना ही गोष्ट कितपत रुचेल तें कोणी सांगावें?

**उत्तर— राष्ट्रीय भावनेचा अतिरेक ज्यांच्या हृदयांत आहे ते या योजनेचा पुरस्कार करणार नाहींत, तर तिला उलट विरोध करतील.** माझ्या राष्ट्राची सत्ता सार्वभौम आहे, राजकारण, अर्थकारण वगैरे क्षेत्रांत माझ्या राष्ट्राला जें वाटेल तें करण्याचें सामर्थ्य असलें पाहिजे, त्यानें दुसऱ्या राष्ट्राचा फायदा होतो कीं तोटा होतो ह्याचा विचार करण्याची आम्हांला गरज नाहीं, मला जें रुचेल तें मी करीन ही भाषा जगांत यापुढें चालणार नाहीं. युद्धाबाबत हें सार्वभौमत्व जगांतील बहुतेक देशांनीं सोडलें आहे. वाटेल त्याच्याशीं युद्ध करण्याचा माझा जन्मसिद्ध हक्क आहे, कोणाशीं युद्ध करावें व कोणाशीं करूं नये हें माझें मी ठरवीन, दुसऱ्या देशांनीं त्याची पंचाईत करूं नये, ही भाषा विसावें शतक उजाडण्यापूर्वीं सर्व जगभर सर्रास बोलली जात होती. गेल्या दोन जागतिक महायुद्धांत ही भाषा बोलणारी अग्रेसर राष्ट्रें नामशेष झालीं आहेत व **संयुक्त राष्ट्रसंघ** या संस्थेंत शिरलेल्या सर्व राष्ट्रांनीं ही भाषा बोलण्याचें टाकून दिलें आहे. या राष्ट्रांनीं युद्धाबाबतचे स्वतःचे सर्वाधिकार जसे संयुक्त राष्ट्रसंघाच्या स्वाधीन केले, तसें अर्थकारणाबाबतचे सर्वाधिकार एकाद्या आंतरराष्ट्रीय संस्थेच्या स्वाधीन केल्याशिवाय दारिद्र्याची हकालपट्टी करण्याची योजना अंमलांत येऊं शकणार नाहीं. असली संस्था सर्वांच्या हिताचें व न्याय्य असें जें अर्थशास्त्रविषयक धोरण आंखील तें त्या राष्ट्रांना पाळावें लागेल. अर्थकारणांत मी फक्त माझ्यापुरतें पाहीन, माझ्या देशाच्या आर्थिक धोरणानें इतर देशांचें नुकसान होतें कीं काय याची पंचाईत मी करणार नाहीं, ही जुनी एकांड्या शिलेदाराची भाषा सोडून आम्हीं सर्व राष्ट्रें परस्परांचें आर्थिक हित पाहूं, परस्परांना विचारून आपलीं धोरणें आंखूं, आर्थिक गोष्टींतले आमचे सर्वाधिकार अमुक एका आंतरराष्ट्रीय संस्थेस देऊन त्या संस्थेच्या धोरणानें चालूं, अशी नवी भाषा जे बोलूं शकतील तेच

जगांतील दारिद्र्याचा नायनाट करूं शकतील. एका बुभुक्षित माणसानें दुसऱ्या बुभुक्षित माणसाला खाऊन टाकण्याचें धोरण न अंगिकारतां एकानें दुसऱ्याशीं सहकार्य करून त्याच्या खांद्यावर उभें रहावें व वरच्या बाजूस झाडाच्या फांदीवरचीं जीं फळें हातास लागतील तीं दोघांनीं खाऊन आपली भूक शांत करावी हें धोरण त्यांनीं स्वीकारलें पाहिजे. **विश्वबंधुत्व हें थिऑसफीचें ध्येय आहे. वरील प्रकारचें आंतरराष्ट्रीय आर्थिक सहकार्य ही त्या ध्येयाकडे जाण्याची पहिली पायरी आहे.** त्या पायरीवर जे चढून जातील त्यांनाच जगांतील दारिद्र्य हटवितां येईल. या मार्गानें पुढें गेल्यास जगांतील दारिद्र्याची हकालपट्टी करतां येईल हें स्पष्ट दिसत असूनही जे या पायरीवर पाऊल टाकण्यास तयार नसतील, ते तोंडानें कांहींही म्हणत असले तरी त्यांना जगांतील दारिद्र्य नष्ट करण्याची खरी आंच लागलेली नाहीं असें म्हणावें लागेल. तुम्ही मघांशीं म्हणाला होतां कीं, आजच्या तरुणांना खरोखरीच दारिद्र्याचा नायनाट करायला हवा आहे; त्या वेळीं मी जी शंका प्रदर्शित केली होती तिचें कारण आतां तुमच्या ध्यानांत आलें असेलच.

जर जगांतून दारिद्र्य घालवावयाचें असेल तर युद्धेंही बंद झालीं पाहिजेत. युद्धांत बॉम्ब टाकून रस्ते, पूल, पाटबंधारे, कारखाने, यंत्रें, नद्यांस घातलेले बांध, रेल्वे, आगगाड्या, आगबोटी, रसायनशाळा वगैरेंची राखरांगोळी होते. संपत्ति निर्माण करण्याचीं हीं सर्व साधनें होत. तीं साधनें जर पुनः पुनः धुळीस मिळालीं तर नानावस्तूंचें भरपूर प्रमाणावर उत्पादन करून सर्व लोकांना त्या मिळेशा करणें अगदीं अशक्य होईल.

**प्रश्न**—ही योजना लोकांना न आवडल्यामुळें जर त्यांनीं ती अंमलांत आणिली नाहीं तर काय होईल ?

**उत्तर — आज जसें जगांत बहुतेक लोक कंगाल व दरिद्री आहेत तसेच ते पुढेंही रहातील.** समजा माझ्या मुलाला जखम होऊन व त्या जखमेंत विशिष्ट प्रकारचे जंतु शिरून त्याला धनुर्वात होण्याचीं चिन्हें

दिसूं लागलीं आहेत. अमूक एक औषध टोंचल्याशिवाय हा मुलगा बरा होणार नाहीं असें जर डॉक्टरचें मत पडलें, तर तें औषध त्या डॉक्टरला मी माझ्या मुलाला टोंचावयास सांगितलें पाहिजे. पण तसें न करतां मी जर म्हणालों कीं, या औषधाचा रंग माझ्या डोळ्याला बरा दिसत नाहीं किंवा माझ्या काकीला हें औषध टोंचलेलें आवडत नाहीं, आणि हा आक्षेप घेऊन जर मी माझ्या मुलाला तें औषध टोंचवलें नाहीं तर काय होईल? धनुर्वात होऊन माझा मुलगा मरेल!!

आतांच्या ह्या संवादांत एक अत्यंत भानगडीचा विषय मी तुम्हांला सोपा करून सांगण्याचा प्रयत्न केला आहे. तो सोपा करतांना फक्त कांहीं महत्त्वाचे मुद्दे मला घेतां आलेले आहेत, व कित्येक मुद्दे गाळावे लागलेले आहेत; पुष्कळसा तपशील सांगतां आलेला नाहीं. **फक्त दारिद्र्य घालविण्याचा प्रश्न विधायकरीतीनें सोडवावयाचा असल्यास कोणत्या दिशेनें जावें लागेल इतकेंच मार्गदर्शन मी करूं शकलों आहें.** तेव्हां हें विवेचन अगदीं त्रोटक आहे हें लक्षांत ठेऊनच तुम्ही त्याचा विचार करावा अशी माझी तुम्हांला विनंति आहे.

दुसरें असें, कीं लोकांचें दारिद्र्य घालविल्यानें लोक आपोआप सुखी, व सुसंस्कृत होतील असें मला वाटत नाहीं. आज जगांत पुष्कळ लोक श्रीमंत आहेत. पण त्यांतले पुष्कळसे सुखी व सुसंस्कृत नाहींत. श्रीमंतीनें माणसाला आढ्यता येते. व्यसनांत पडण्याचा मोह उत्पन्न होतो. इतरांबद्दल तुच्छता वाटते. काम करूं नये, आळशी रहावें असें वाटण्याचा संभव असतो. वेश्यागृहें, शर्यतींचीं मैदानें, यांत अनेक श्रीमंत लोक आढळतात. इस्टेटीसंबंधींचीं कोर्टांतील भांडणें, बापलेकांचा किंवा नवरा–बायकोचा बेबनाव, काळ्या बाजारांतील नफे–बाजी, पैशाची अफरातफर, व्यवहारांतला खोटेपणा या गोष्टींचा किती-तरी वेळां श्रीमंतीशीं संबंध असलेला दिसून येतो. तेव्हां मी सांगितलेलें धोरण जर मानवजातीनें शंभर दीडशें वर्षें स्वीकारलें तर जगांतील दारिद्र्य

जाईल हें खरें आहे; पण दारिद्र्य जाऊन जनतेला सर्व आवश्यक गोष्टी तसेंच सर्व ऐषआरामाच्या गोष्टी मिळाल्या म्हणजे लोक सुस्वभावी, विवेकी, उदारवृत्तीचे, परोपकारशील व प्रेमळ होतील असें बिलकुल नाहीं. आज **दारिद्र्यरूपी जी एक मोठी अडचण** बहुजनसमाजासमोर आहे ती जाईल. ती अडचण घालवणें अत्यंत निकडीचें आहे. ती कशी घालवावयाची त्याचा खुलासा मी केला आहे. पण **ती गेली तरी माणसाला सुखी, सुस्वभावी व सुसंस्कृत करण्यासाठीं दुसरा प्रयत्न सुरू ठेवावा लागेल.** माणसाचें शिक्षण सुधारावें लागेल. त्याच्या समोर वेगळीं ध्येयें ठेवावीं लागतील. त्याला खरीं मूल्यें पटवून द्यावीं लागतील. नुसतें दारिद्य घालविल्यानें माणूस आपोआप सुखी व सुसंस्कृत होणार नाहीं. नुसतें दारिद्य घालविलें व दुसरा कांहीं प्रयत्न सुरू ठेवला नाहीं तर हल्लींच्या पैसेवाल्या लोकांप्रमाणें जनता अधिकाधिक हांवरी, गर्विष्ठ व स्वार्थी होईल, आणि समाज अधोगतीला जाईल.

आम्हीं थिऑसफिस्ट लोक असें म्हणतों कीं, जगांतील घडामोडींच्या पाठीमागें ईश्वराचें एक सूत्र असतें, एक मानवी उत्क्रांतीची योजना असते. त्या योजनेनुसार बोलावयाचें असलें तर मी म्हणेन कीं आज एक युग संपून दुसऱ्या युगाला सुरुवात होत आहे. जुनी विचारसरणी, जुना दृष्टिकोण, जुनी रहाणी, जुनें राजकारण, जुनें अर्थकारण, जुना वेदान्त हीं मागें पडत असून लवकरच उजाडणाऱ्या नव्या युगांत या सर्व गोष्टींचें स्वरूप बदलणार आहे आणि जगाची एक वेगळी घडी बसणार आहे. **जुनें मोडण्याचा व नवें घडण्याचा आजचा हा संक्रमणकाल आहे. जो शहाणा असेल त्यानें आजच्या घडामोडींच्या पाठीमागें जें ईश्वरी सूत्र आहे, जी उत्क्रान्तियोजना आहे तिच्याकडे प्रतिभेच्या डोळ्यांनीं बघावें, ती समजून घ्यावी आणि यथाशक्ति आपल्या विचारांचा व क्रियांचा त्या योजनेला पाठिंबा द्यावा.** पुष्कळांनीं ती योजना समजाऊन घेऊन तिला स्वतःचें पाठबळ दिलें तर ती लवकर सिद्धीस जाईल आणि योग्य कार्याला साहाय्य दिल्याचें समाधान त्यांना

लाभेल. ती समजून घेतली नाहीं व अज्ञानानें वा दुराग्रहानें तिला विरोध केला तर ती सिद्धीस जाण्याच्या मार्गांत कांहीं अडचणी येतील आणि तिचें फळ मानव जातीच्या हातीं पडण्याला कांहीं अधिक वेळ लागेल. पण ती योजना ईश्वरी सूत्रांत गुंफलेली असल्यामुळें, ती कधींही फोल होणार नाहीं. आपण तिला दुजोरा दिला तर आज जरी आपणांला लोकांनीं मूर्खांत काढलें तरी आपण परिणामी शहाणे ठरूं. विरोध केला तर तिचा प्रवाह आपल्याला पाण्यांत बुडवून तो आपल्या डोक्यावरून इष्टस्थळीं जाईलच जाईल. तुम्हां तरुणांनीं व तुमच्या राजकारणी पुढाऱ्यांनीं याबाबत काय धोरण स्वीकारावें तें तुमचें तुम्ही ठरवावयास हवें.

---

**या पुस्तिकेंतील शेवटच्या भागांत सुचविलेल्या साधनासंबंधीं अधिक माहिती व चर्चा पुढील ठिकाणीं जिज्ञासूंस पहावयास मिळेल.**

( 1 ) Economics and Theosophy—by C. Jinarajadasa ( 1944 )—T. P. H. Adyar

( 2 ) Theosophy and Reconstruction—by C. Jinarajadasa March 1942, Theosophist pages 426-29

( 3 ) The New Mental Framework Necessary for Man —by C. Jinarajadasa—Theosophist–February 1948 (P. 388)

( 4 ) The New Civilization—Economics of the New Civilization ( Pages 81–110 ) Lectures given in London in 1927, by A. Besant.

( 5 ) The New World of Socialism by Rohit Mehta.

Available from
THE THEOSOPHICAL PUBLISHING HOUSE,
ADYAR MADRAS 20

ठेविली आहे. ही मांडणी प्रत्येकाच्या मनांत स्वतःच्या धर्माबद्दल आदर निर्माण करून त्यांतील रहस्य स्पष्ट करते व त्याबरोबरच जगांतील इतर धर्माबद्दल सहानुभूति निर्माण करते. ती मांडणी अनेक प्रश्नांस समर्पक उत्तरेंही देते. मृत्यु म्हणजे काय ! मृत्यूनंतर जीव शाबूद रहातो का ! माणसाला एक जन्म असतो कीं अनेक असतात ! माणसाची उत्क्रान्ति कशी होते ! ईश्वर आहे का ! मानवी इतिहासाच्या पाठीशीं कोणी सूत्रधार आहेत का ! जगाची नवीन घडी कशी बसवितां येईल ! असल्या प्रश्नांस थिऑसफींत नवीन रीतीचीं व समर्पक उत्तरें देण्यांत येत असतात.

बंधुत्वाची आवड असणाऱ्या कोणत्याही जिज्ञासूला थिऑसॉफिकल सोसायटीचा सभासद होतां येते. **थि. सोसायटींत संपूर्ण मतस्वातंत्र्य आहे.** थिऑसफीच्या अमुक एका सिद्धान्तावर सभासदानें श्रद्धा ठेवली पाहिजे असा कोणताही निर्बंध नाहीं. अभ्यास करून सभासदांनीं आपलीं मतें बनवावीं, असें सोसायटीचें सभासदांना सांगणें आहे. यावरून दिसून येईल कीं **थिऑसॉफिकल सोसायटी किंवा थिऑसफी ह्यांना पंथ असें म्हणतां येणार नाहीं.** ही सोसायटी नुसती तात्त्विक चर्चा करण्यासाठीं काढलेली नाहीं. स्वतःला आणि जगाला सुधारण्यासाठीं, सर्वांना समजूतदार व कर्तव्यदक्ष करण्यासाठीं, जगांतील दुःख कमी व्हावें एतदर्थ नाना उद्योग करण्यासाठीं ती स्थापिलेली आहे.

थिऑसॉफिकल सोसायटीची **घटना लोकशाहीस धरून आहे.** तिचे सध्याचे लोकनियुक्त अध्यक्ष श्री. एन्. श्रीराम हे आहेत. तिचें आंतरराष्ट्रीय मुख्य पीठ मद्रासनजीक अड्यार येथें आहे. हिंदुस्थानांतील मराठीच्या प्रान्तांत तिच्या चौदा शाखा आहेत. **या शाखांस संघटित करणाऱ्या संस्थेस मराठी थिऑसॉफिकल फेडरेशन म्हणतात.** तिचे सध्यांचे अध्यक्ष श्री. राजाराम सखाराम भागवत एम्. ए. पोलिस लाईनजवळ, ठाणें, हे आहेत. **चिटणीस** श्री. गंगाधर रघुनाथ भडभडे बी. ए., एलएल्. बी., १८ गणेशवाडी, पुणें ४, व श्री. गोपाळ हरी कुंटे बी. एस्‌सी, सेवानिवृत्त मुख्याध्यापक, ७८१ रविवार, नाशिक—हे आहेत. त्यांचेपैकीं कोणाहीकडून जास्त माहिती जिज्ञासूंस मिळूं शकेल.

---

## मराठी थिऑसॉफिकल फेडरेशननें प्रसिद्ध केलेलीं पुस्तकें

| | रु. आ. पै. |
|---|---|
| (१) **थिऑसफीवरील सुबोध व्याख्यानें** भाषांतरकार दे. भा. लेले, बी. ए. | ०—१२—० |
| (२) **सिद्धपुरुष व त्यांचा संप्रदाय** लेखक वा. ल. चिपळूणकर व रा. स. भागवत | १—१२—० |
| (३) **हिंदु सामुदायिक पूजा** ( भारत–समाज-रचित ) सार्थ व सटीप ले. रा. स. भागवत एम्. ए. ( ठाणें ) | ०—४—० |
| (४) **महम्मद पैगंबर व त्यांचा इस्लामधर्म** ले. वा. ल. चिपळूणकर | ०—४—० |
| (५) **मृत्यूनंतर काय ?** ( दोन जिज्ञासूंचा संवाद ) ले. रा. स. भागवत. एम्. ए. | ०—४—० |
| (६) **ईश्वर आहे काय ?** ( दोन जिज्ञासूं-मधील संवाद )–ले. रा. स. भागवत | ०—४—० |
| (७) **थिऑसफी म्हणजे काय ?** ले. रा. स. भागवत, एम्. ए. | ०—४—० |
| (८) **साधनचतुष्टय**—"कृष्णजी"-कृत "At the Feet of the Master" चें मराठी भाषांतर | ०—८—० |
| (९) **जीवनाचा हेतु**—लेखक वा. ल. चिपळूणकर | ०—४—० |
| (१०) **थिऑसफींत नवीन काय आहे ?** ( दोन जिज्ञासूंचा संवाद ) ले. वा. ल. चिपळूणकर व रा. स. भागवत | ०—४—० |

---

| | |
|---|---|
| १ **बेझंट–चरित्र**—आवृत्ति २ री ( १९४७ ) ले. रा. स. भागवत. प्रकाशक : महाराष्ट्र ग्रंथभांडार, लि. मुंबई ४. | ५—०—० |
| २ **राजयोगाचीं मूलतत्त्वें व अभ्यास**-ले. रा. स. भागवत एम्. ए. प्र. महाराष्ट्र ग्रंथभांडार, लि. मुंबई ४ | ३—०—० |
| ३ **जीवन आणि कला**–श्री. जिनराजदास ( माजी अध्यक्ष थि. सोसायटी ) यांच्या लेखांचा अनुवाद, ले.–दे. भा. लेले, प्र. महाराष्ट्र ग्रंथभांडार, लि. मुंबई ४. | ३—०—० |
| ४ **मृत्यु व मृत्यूनंतर**–ले. रा. स. भागवत, एम्. ए., प्र. अ. अं. कुळकर्णी, कॉंटिनेंटल प्रकाशन, टिळक रोड, पुणें २. | १—८—० |
| ५ **स्वप्नसृष्टि**–ले. ज. ना. ढगे, एम्. ए, ठाणें पृ. १२५ ३१ ऑक्टोबर पर्यंत नांवें नोंदविल्यास १–४–० रु. | १—[illegible]—० |

वर दिलेलीं थिऑसॉफिकल फेडरेशननें प्रसिद्ध केलेलीं मराठी पुस्तकें व इतर वरील पुस्तकें पुढील पत्त्यावर चौकशी केल्यास मिळूं शकतील— श्री. दत्तात्रेय गोविंद काळे बी. ए., गोविंदभुवन, आपटे रोड, पुणें ४.

आ. भू. प्रेस, पुणें ४. ]